**सार्वजनिक वितरण व्यवस्थेतंर्गत साखरेच्या विक्रीसाठी दुकानदारांचे कमिशन / मार्जिनचे दर, साखर वाहतूकदारांचे रिबेट व लाभार्थ्यांना वितरित करण्यात येणाऱ्या साखरेच्या किरकोळ विक्री दर यात सुधारणा करणे तसेच शासकीय धान्य गोदाम ते शिधावाटप दुकानापर्यंतची साखरेची वाहतूक अन्नधान्याच्या नियमित वाहतुकीच्या यंत्रणेमार्फत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन,**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : साखर-१११६/प्र.क्र.६९/नापु-१९ ,**
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : ११ एप्रिल, २०१७.

**पहावे :-** १. शासन निर्णय क्रमांक : कंत्राट-१०१२/प्र.क्र.६०/नापु-१६-अ, दि. २६.११.२०१२.
२. शासन निर्णय क्रमांक : साखर-२०१४/प्र.क्र.१२३/नापु-१९ , दि. १७.१२.२०१४.
३. शासन शुध्दीपत्रक क्रमांक : साखर-२०१४/प्र.क्र.१२३/नापु-१९ , दि. २२.७. २०१६
४. शासन निर्णय क्रमांक : राभादु-२११५/प्र.क्र.३२६/१६/नापु-३१ , दि. २९.८.२०१६.

**प्रस्तावना :**

राज्यातील शिधावाटप दुकानदारांच्या संघटनांकडून साखरेच्या वितरणाकरीता कमिशन/ मार्जिन वाढवून देण्याची मागणी वारंवार शासनाकडे करण्यात येत होती. सार्वजनिक वितरण व्यवस्थेतील अन्नधान्याची वाहतूक करणाऱ्या वाहतूकदारांना वाहतूकीचे दर संदर्भ क्र.४ वरील दिनांक २९.८.२०१६ च्या शासन निर्णयान्वये वाढवून देण्यात आलेले आहेत. लाभार्थ्यांना साखरेचे नियमित वितरण व्हावे या दृष्टीकोनातून साखरेची वाहतूक देखील नियमित होणे आवश्यक आहे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक तत्वानुसार राज्यावर आर्थिक बोजा पडत असेल तर साखरेचे दर वाढविण्याची मुभा राज्य शासनाला देण्यात आलेली आहे.

स्वस्त धान्य दुकानदार संघटनांकडून होणारी मागणी, अन्नधान्य वाहतूकीचे दर सुधारित केल्यामुळे साखर वाहतूकदारांकडून येणाऱ्या संभाव्य दरवाढीची मागणी तसेच साखरेचे बाजारभाव विचारात घेऊन, दुकानदारांना देण्यात येणारे कमिशन, साखरेच्या वाहतूकीचे दर आणि साखरेचा किरकोळ विक्रीचा दर ठरविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

वरील सर्व बाबींचा विचार करुन शासनाने आता खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :**

१) सार्वजक वितरण व्यवस्थेतंर्गत वितरीत करण्यात येणाऱ्या साखरेच्या रास्तभाव दुकानदाराचे कमिशन/मार्जिन प्रति क्विंटल रु.६.३६ वरुन ते आता रु.७० प्रति क्विंटल करण्यात येत आहे.

२) शासकीय गोदाम ते शिधावाटप दुकानापर्यंतच्या दुसऱ्या टप्प्याची साखरेची वाहतूक संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयातील तरतुदीनुसार अन्नधान्याची वाहतूक करणाऱ्या यंत्रणेमार्फत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

३) शासकीय गोदाम ते शिधावाटप दुकानापर्यंतच्या दुसऱ्या टप्प्याच्या साखरेच्या वाहतूकीसाठी संदर्भाधीन क्र.४ अन्वये साखरेचे दर खालीलप्रमाणे निश्चित करण्यात आले आहेत. तेच दर साखर वाहतूकीसाठीही लागू राहतील :-

| **अ. क्र.** | **क्षेत्र व अंतर** | **वाहतूक रिबेट (रुपये प्रति क्विंटल)** |
|---|---|---|
| १ | मुंबई-ठाणे शिधावाटप क्षेत्र व पुणे, नागपूर, सोलापूर महानगरपालिका क्षेत्रे (अंतर विचारात न घेता) | १४.५८ |
| २ | इतर क्षेत्रे:<br>अ) गोदामापासून २० कि.मी. पर्यंत अंतर असल्यास | १६.५३ |
| | ब) गोदामापासून २० कि.मी. पेक्षा जास्त अंतर असल्यास | १९.४४ |

४) ज्या जिल्हयामध्ये द्वारपोच योजनेतंर्गत साखरेची वाहतूक सुरू होईल त्या जिल्ह्यात साखरेच्या वाहतूकीचे वरीलप्रमाणे वाहतूक रिबेट देण्याचे आपोआप बंद होईल.

५) लाभार्थ्यांना वितरीत करण्यात येणाऱ्या साखरेचे किरकोळ विक्री दर आता रु.१३.५० ऐवजी रु.१५.०० प्रति क्विंटल असतील.

६) यापुढे अन्नधान्याचे वाहतूक रिबेट व दुकानदारांना देण्यात येणाऱ्या कमिशन/मार्जिन मध्ये सुधारणा झाल्यास, ते सुधारित दर साखरेसाठी आपोआप लागू राहतील.

२. हा शासन निर्णय निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून लागू होईल.

३. शिधावाटप दुकानदारांच्या कमिशन/मार्जिन वरील खर्च मुंबई, ठाणे शिधावाटप क्षेत्रासाठी सार्वजनिक वितरण व्यवस्थेतंर्गत “मागणी क्र. एम-४, ४४०८- अन्न साठवण व वखार साठवण यावरील भांडवली खर्च ०१-अन्न-१०१ प्रापण व पुरवठा (०२) (०५), मुंबई शहर साखर खरेदीवरील अनुषंगिक खर्च (योजनेत्तर) (४४०८ ०२६४).”

**मुंबई ठाणे शिधावाटप क्षेत्राव्यतिरिक्त जिल्ह्यांसाठी**

सार्वजनिक वितरण व्यवस्थेतंर्गत “मागणी क्र. एम-४, ४४०८- अन्न साठवण व वखार साठवण यावरील भांडवली खर्च ०१-अन्न-१०१ प्रापण व पुरवठा (०२) (०६), मुफसल साखर खरेदीवरील अनुषंगिक खर्च (योजनेत्तर) (४४०८ ०२७३).”

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०४१११५५३१७५००६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Mahesh Dinkar Pathak

Digitally signed by Mahesh Dinkar Pathak
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food,Civil Supplies And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e9535c95dc1a6714290a6a1e084b3bb4cc266f737f88ea4b79e3f83c4a7ca12d, cn=Mahesh Dinkar Pathak
Date: 2017.04.11 15:57:26 +05'30'

**(महेश पाठक)**
प्रधान सचिव,
अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.

२. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव.
३. मा. राज्यमंत्री , अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, यांचे खाजगी सचिव.
४. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव.
५. मा. प्रधान सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक.
६. मा.प्रधान सचिव, वित्त विभाग.
७. सर्व प्रशासकीय विभागप्रमुख.
८. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता) , महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल-२ (लेखा परिक्षा) , महाराष्ट्र, नागपूर
१०.महालेखापाल-१ (लेखा परिक्षा) , महाराष्ट्र, मुंबई
११.महालेखापाल-२ (लेखा परिक्षा) , महाराष्ट्र, नागपूर
१२.सर्व विभागीय आयुक्त,
१३.सर्व जिल्हाधिकारी,
१४.नियंत्रक, वैधमापनशास्त्र, मुंबई,
१५.नियंत्रक, शिधावाटप, मुंबई,
१६.संचालक, नागरी पुरवठा (गो/वा), मुंबई,
१७.उप संचालक, पुरवठा आयुक्तांचे कार्यालय, मुंबई
१८. वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
१९.सर्व उपायुक्त पुरवठा,
२०.सर्व अपर जिल्हाधिकारी (मुंबई व मुंबई उपनगर वगळता),
२१.सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी,
२२.अन्नधान्य वितरण अधिकारी, पुणे/नागपूर/सोलापूर,
२३.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
२४.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
२५.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
२६.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२७.विभागातील सर्व अधिकारी (सचिव वगळता),
२८. प्रबंधक, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई,
२९.वित्त विभाग (व्यय-४/ विनियम कार्यासन),
३०.माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
३१.निवड नस्ती, नापु-१९.